सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठास ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या बाबीकरीता निधी वितरीत करण्याबाबत.... (कार्यक्रम खर्च).

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: कोकृवि-११२३/प्र.क्र.१०४/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१/०३/२०२४.

**वाचा :** १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय समक्रमांक दि.०३.०७.२०२३ व दि.२०.०२.२०२४
३)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.कोकृवि-११२४/प्र.क्र.३४/७अे, दि.०९.०२.२०२४.
४) नियंत्रक,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांचे पत्र क्र. डॉबासाकोकृवि/लेखा-२/१४३६/२०२४,दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली या कृषि विद्यापीठास मागणी क्र.डी-३, ०१,पीकसंवर्धन,१२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०७) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००८१) या लेखाशीर्षातंर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान या बाबीकरीता एकूण रु.१७००.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. सदर मंजूर तरतूदीमधून वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकानुसार दापोली कृषि विद्यापीठातील चालू असलेल्या विविध इमारत बांधकामांकरीता संदर्भ क्र.२ येथील दि.०३.०७.२०२३ व दि.२०.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु.१४५.०० लाख व रु.१९५.०० असा एकूण रु.३४०.०० लाख निधी वितरीत करण्यात आला आहे.

डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली कृषि विद्यापीठ व विद्यापीठातंर्गतची विविध महाविद्यालये,वसतीगृहे व अस्तित्वात असलेल्या इमारती जुन्या असल्याने व सदर इमारतींमध्ये आग प्रतिबंधक यंत्रणा कार्यान्वित नसल्याने, संदर्भ क्र.३ येथील दि.०९.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली अंतर्गत विविध

महाविद्यालये, वसतीगृहे तसेच, इतर विविध शैक्षणिक इमारती, अशा एकुण १८ इमारतींसाठी अग्निशमन यंत्रणा उभारणीसाठी एकूण रु.१४६९.४४ लाख इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने अग्निशमन यंत्रणा उभारणीसाठी सन २०२३-२४ या वर्षातील मंजूर तरतूदीमधून रु.८५०.०० लाख निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांनी संदर्भ क्र.४ अन्वये केली आहे. त्यानुषंगाने डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास अग्निशमन यंत्रणा उभारणीसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००८१, या लेखाशीर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता सन २०२३-२४ या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून व सुधारित अंदाजाच्या मर्यादेत खालीलप्रमाणे रु.८५०.००/- (अक्षरी रुपये आठ कोटी पन्नास लाख फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | योजना/योजनेंतर्गत येणारे महाविद्यालय | प्रशासकीय मान्यता किंमत | प्रशासकीय मान्यतेनुसार यापुर्वी वितरीत निधी | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मूळ अर्थसंकल्पीत तरतूद | सन २०२३-२४ सुधारित अंदाज | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | | ५ | ७ | ८ |
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०७) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ००८१, ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत विविध महाविद्यालये, वसतीगृहे तसेच, इतर विविध शैक्षणिक १८ इमारतींसाठी अग्निशमन यंत्रणा उभारणे | १४६९.४४ | ०.०० | १७००.०० | ११९०.०० | ८५०.०० |
| | **एकूण -** | | | | **१७००.००** | **११९०.००** | **८५०.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२२, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/ योजनांसाठी/ बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधीत कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

८) सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेला निधी दि.३१.०३.२०२४ पर्यंत निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही,याची कृपया दक्षता घ्यावी.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/का.१४३१, दि.०५.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०९/२०२४/व्यय-१, दि.११.०३.२०२४ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२११७३१२८५४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.21 17:40:51 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
४. कुलगुरु / कुलसचिव,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली.
५. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
६. नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली.
७. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी/ उपकोषागार अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.कक्ष अधिकारी, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.